**यशवंत पंचायत राज अभियान अंतर्गत प्राप्त झालेल्या पारितोषिक रकमेचा पंचायत संस्थांनी विनियोग करण्याबाबत मार्गदर्शक तत्वे**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
**शासन परिपत्रक क्रमांक : झेडपीए १००८//प्र.क्र.१४८/पंरा-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक :२४ डिसेंबर,२००९.**

**वाचा:-** १. शासन निर्णय क्रमांक झेडपीए १००८//प्र.क्र.१४८/पंरा-१ दिनांक ५ नोव्हेंबर २००८.
२. शासन शुध्दीपत्रक क्रमांक झेडपीए १००८//प्र.क्र.१४८/पंरा-१ दिनांक २८ जानेवारी, २००९.

**शासन परिपत्रक :-**

**प्रस्तावना :**

ग्रामीण महाराष्ट्राच्या विकासामध्ये पंचायत राज संस्थांचे योगदान मोठे आहे. राज्यामधील विकासाच्या सर्व योजना पंचायत राज संस्थांमार्फत राबविल्या जातात. तेव्हा पंचायत राज संस्थांच्या कामगिरीनुसार प्रोत्साहित करुन त्यांची कार्यसंस्कृती वाढविणे आवश्यक आहे. यासाठी राज्यात पंचायत राज संस्थांमधून प्रशासकीय व्यवस्थापन व विकास कार्यात उत्कृष्ट काम करणा-या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायतीसाठी सन २००५-२००६ या आर्थिक वर्षापासून विभाग व राज्य अशा दोन्ही स्तरांवर अभिनव पुरस्कार योजना सुरु करण्यात आली असून ही योजना यापुढे कायमस्वरुपी राबविण्यात येणार आहे.

आजपर्यंत या कार्यक्रमासाठी पारितोषिक वितरणासाठी रु.३३.७५ लक्ष एवढी तरतूद करण्यात येत होती. तथापि, संदर्भ क्रमांक २ च्या शासन शुध्दीपत्रकान्वये सन २००८-०९ पासून ही तरतूद रु.२७०.०० लक्ष करण्यात आली आहे. पारितोषिकांच्या रकमेत भरघोस वाढ झाली असून स्थानिक स्वराज्य संस्थांना प्राप्त झालेल्या पारितोषिकाच्या रकमेचा विनियोग त्यांनी कशा प्रकारे करावा, याबाबत पुढील मार्गदर्शक तत्त्वे विहित करण्यात येत आहेत

१. बक्षिसाच्या रक्कमेपैकी १५% निधी संबंधित पंचायत राज संस्थेच्या इमारतीची डागडूजी यासाठी खर्च करण्यात यावा,
२. ३०% निधी कार्यालयीन सजावट, कार्यालयाचे संगणकीकरण, आणि बैठक व्यवस्था करण्यासाठी खर्च करण्यात यावा.
३. ५ % निधी कार्यालय परिसरातील स्वच्छता तसेच कार्यालयातील शौचालयासाठी वापरण्यात यावा.
४. पंचायत राज संस्थांना मिळालेला पुरस्कार हा पदाधिकारी, अधिकारी आणि कर्मचाऱ्यांच्या एकत्रित गुणवत्ता पूर्ण कामामुळे (Qualitative team Work) मिळालेला असतो त्यांना प्रोत्साहन देण्यासाठी ५% निधी राखून ठेवण्यात यावा. अधिकारी आणि कर्मचारी यांची निवड ग्रामपंचायत स्तरावर ग्रामसभा तसेच पंचायत समिती आणि जिल्हा परिषद स्तरावर परिषदेच्या सर्वसाधारण सभेच्या मान्यतेने करण्यात येईल.

५. ४५ %रक्कम पंचायत राज संस्थेमधील इतर विकास कामे, सांस्कृतिक सभागृहाचे बांधकाम, शिक्षण आणि आरोग्य विषयक सुधारणा यासाठी वापरण्यात यावा. यामध्ये पंचायत राज संस्थामधी अंगणवाड्या, बालवाड्या आणि प्राथमिक आरोग्य केंद्र, उपकेंद्र यांच्यातील सुधारणासाठी वापरण्यात यावा.विद्यार्थासाठी विविध स्पर्धा,गुणवंत विद्यार्थांना बक्षिसे, पुढील शिक्षणासाठी मदत यासाठी हा निधी वापरण्यात यावा.

६. या रक्कमेचा विनियोग कोणत्याही सामुहिक विकास योजनेवर खर्च करण्यास तसेच पंचायत राज संस्था आर्थिक व प्रशासकीय दृष्या सक्षम होण्याच्या दृष्टीने उपाययोजना करण्यासाठी खर्च करण्यास अनुमती आहे.

७. बक्षिसाच्या रक्कमेतून खर्च करण्याबाबत निर्णय घेण्याचे अधिकार ग्रामपंचायत स्तरावर ग्रामसभेला असतील, तसेच पंचायत समिती आणि जिल्हा परिषद स्तरावर पंचायत समिती / जिल्हा परिषदेच्या सर्वसाधारण सभेच्या मान्यतेने घेण्यात यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक **२००९१२२४१३४१०६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

प्रशांत रसाळ

( डॉ. प्रशांत रसाळ )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे खाजगी सचिव.
२) मा. मंत्री (ग्रा. वि.) यांचे खाजगी सचिव.
३) मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
४) मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद सर्व ( मुख्य कार्यकारी अधिकारी मार्फत).
५) मा.सचिव (ग्राम विकास व पंचायत राज).
६) विभागीय आयुक्त (सर्व).
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
८) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), महाराष्ट्र - १, मुंबई.
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), महाराष्ट्र - २, नागपूर.
१२) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१३) उपमुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व).
१४) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई.
१५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-७, वित्त-८, पंरा-९, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवड नस्ती, कार्यासन क्र.पंरा-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.